जिल्हा स्तरावर जिल्हा नियोजन समिती अतंर्गत रस्ता सुरक्षा उपाययोजना करण्यासाठी स्वतंत्रपणे "जिल्हा रस्ता सुरक्षा उपाययोजना" योजना सुरु करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृह (परिवहन) विभाग**
**शासन निर्णय क्र. एमव्हीआर-११२२/प्र.क्र.२०४/परि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २० मार्च, २०२३

**प्रस्तावना :**

भारतात रस्ते अपघात ही एक गंभीर समस्या आहे. भारतात दरवर्षी १.५० लाख लोक रस्ते अपघातात जीव गमावतात. महाराष्ट्रात देखील ही संख्या सुमारे १४,८०० आहे. महाराष्ट्रात घडणाऱ्या रस्ते अपघातांचे प्रमाण लक्षात घेता संपुर्ण भारतामध्ये रस्ते अपघातात महाराष्ट्राचा तिसरा क्रमांक लागतो. ही बाब गंभीर असून केंद्रिय रस्ते व परिवहन मंत्रालय यांनी २०२५ पर्यंत रस्ते अपघातामध्ये मृत्यूचे प्रमाण ५०% पर्यंत कमी करण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे. तसेच मा.सर्वोच्च न्यायालयाने गठीत केलेल्या रस्ता सुरक्षा समितीने वेळोवेळी दिलेल्या निर्देशांचे अंमलबजावणी करणे राज्य शासनावर बंधनकारक आहे. रस्ते अपघतात होणारी जिवीत व वित्तहानी टाळण्यासाठीची उपाययोजना व नवीन सुधारीत धोरण ठरविणेबाबत मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दि. १७.१०.२०२२ रोजी बैठक घेण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये मा. मुख्यमंत्री यांनी रस्ते सुरक्षा संदर्भात विविध विभागांना निर्देश दिले आहेत. मा. मुख्यमंत्री यांनी दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने संबंधित विभागांनी केलेल्या कार्यवाहीचा आढावा घेण्याकरीता मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली दि.१०.११.२०२२ रोजी बैठक घेण्यात आली. महामार्गा व्यतिरिक्त राज्यात शहरी आणि ग्रामिण भागामध्ये मोठया प्रमाणात अपघात व अपघाती मृत्युचे प्रमाण आहे. अपघात नियंत्रणकरीता स्थानिक परिस्थितीनुसार जिल्हास्तरावर उपाययोजना होणे आवश्यक आहे. तथापि सद्य परिस्थितीत अशी कोणतीही योजना अस्तित्वात नसल्याने जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत “रस्ता सुरक्षा उपाययोजना” अशी योजना नव्याने सुरू करुन त्यामध्ये योग्य त्या निधीची तरतुद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

रस्ता सुरक्षा उपाययोजना करण्यासाठी जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत स्वतंत्रपणे "जिल्हा रस्ता सुरक्षा उपाययोजना” योजना सुरु करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. राज्याच्या जिल्हा वार्षिक योजनेसाठी एकूण मंजूर निधीमधून या कामी खर्च करण्यात यावा. सदर निधीमधून खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

- जिल्ह्यातील सर्व रस्त्यांचे सर्वेक्षण करुन त्यावर कोणत्या ठिकाणी सुचना फलक, वाहतुक चिन्हे आवश्यक आहेत याबाबत अहवाल सादर करण्यासाठी संस्थेची नेमणूक करणे व आवश्यक त्या ठिकाणी दिशादर्शक फलक लावणे इत्यादी. तथापि ज्या रस्त्यावर संबंधित यंत्रणेमार्फत फलक लावणे करारानुसार बंधनकारक आहे, त्या रस्त्यावर दिशादर्शक फलके संबंधित यंत्रणेमार्फत लावणे.
- रस्त्यावर अपघात टाळण्याकरीता आवश्यक त्या ठिकाणी वाहनचालक, प्रवासी व पादचारी यांना प्रबोधन पर / धोक्याचा ईशारा देणारे दर्शक फलक लावणे.
- अपघात प्रवणक्षेत्र (vulnerable spots) वर तात्पुरत्या व कायमस्वरूपी उपाययोजना करणे जसे की रस्त्यावरील प्रकाश व्यवस्था (street lights), वृक्षांच्या फांद्या कापणे, अपघातप्रवण क्षेत्र परीसरात आवश्यक ते स्थापत्य दुरुस्ती (Civil work), इत्यादी, वरील बाबींशिवाय अपघात प्रवणक्षेत्रावर अपघात टाळण्याकरीता अनुषंगीक व आवश्यक त्या सर्व उपाययोजना करणे.
- रस्त्यावरील परावर्तक, ब्लिकर्स, क्रॅशबॅरिअर (crash barriers) इत्यादी बाबी बसविणे. (उपरोक्त बाबी या उदाहरण म्हणून दर्शविण्यात आल्या आहेत. तथापि स्थानिक परिस्थितीनुसार निर्णय घेऊन आवश्यक त्या सर्व उपाययोजना करणे.
- पोर्टेबल वजनकाटे (portable weight bridge), speed guns, dynamic speed indicators, Reflecto Meter, Reflective Paints इत्यादी बाबींची खरेदी करणे. (उपरोक्त बाबी या उदाहरण म्हणून दर्शविण्यात आल्या आहेत. तथापि स्थानिक परिस्थितीनुसार निर्णय घेऊन आवश्यक त्या सर्व उपाययोजना करणे.)
- अपघातास कारणीभुत रस्त्यावरील खड्डे बुजवण्याकरीता अथवा अपघात टाळण्यास आवश्यक तेथे तात्पुरत्या स्वरूपातील रस्ते तयार करण्याकरीता. तथापि ज्या रस्त्यांवर संबंधित यंत्रणेमार्फत वरीलप्रमाणे कार्यवाही आवश्यक आहे, त्या यंत्रेणेने त्यांच्या निधीतुन सदर कार्यवाही करावी. अपवादात्मक परिस्थितीत संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी सदर योजने अंतर्गत या बाबींवर खर्च करावा. तथापि कोणत्याही परिस्थितीत खड्डे बुजविणे, अथवा तात्पुरते रस्ते करणे या बाबींवर या योजनेअंतर्गत जिल्ह्यासाठी मंजूर नियतव्ययाच्या अधिकतम १५% इतका निधी एका वर्षात खर्च करता येईल.
- जिल्ह्यात रस्ता सुरक्षा संदर्भात प्रसिध्दी व प्रसार करणे.
- अंमलबजावणी करणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांसाठी रस्ता सुरक्षा जॅकेट व अनुषंगिक उपकरणे व इतर आवश्यक सामग्री खरेदी करणे.

- रस्ताच्या काठावरील तसेच फुटपाथवरील अपघातास कारणीभूत ठरणारे अतिक्रमणे काढणे.
- अपघात टाळण्याच्या दृष्टिकोनातून आवश्यक तेथे रिफ्लेक्टिव्ह पेंट लावणे.
- परिवहन संवर्गातील शासकीय वाहनांना रिफ्लेक्टिव्ह टेप लावणे.
- रस्ता सुरक्षा संदर्भात परिवहन विभागाने जारी केलेल्या सुचनांची अंमलबजावणी करण्याकरीता निधी उपलब्ध करुन देणे.
- अपघात टाळण्यासाठी जिल्हा रस्ता सुरक्षा समितीने सुचविलेल्या उपाययोजना करणे.

**योजनेची अंमलबजावणी:-**

प्रस्तुत योजनेअंतर्गत विविध कामे घेण्यात येणार असली तरी, योजनची अंमलबजावणी त्या जिल्ह्यातील प्रादेशिक परिवहन अधिकारी / उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचेमार्फत करण्यात येईल. विविध विभागांचे प्रस्ताव जिल्हा रस्ता सुरक्षा समितीच्या मान्यतेने जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव जिल्हा नियोजन समिती यांना सादर करण्याची जबाबदारी प्रादेशिक परिवहन अधिकारी / उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांची राहील.

**निधीचे नियंत्रण :-**

सदर निधीचे नियंत्रण संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त राहिल. नियोजन विभागाने जिल्हा नियोजन निधीच्या विनियोजनासंदर्भात वेळोवेळी जारी केलेल्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वानुसार सदर निधी खर्च करावा. अपघात टाळण्यासंबंधी सुचविलेल्या सर्व उपाययोजनेस जिल्हा रस्ता सुरक्षा समितीत मान्यता घ्यावी. या निधीचे लेखांकन व लेखापरिक्षण महालेखापाल व वित्त विभागाने दिलेल्या सुचनांप्रमाणे करण्यात येईल.

**तांत्रिक मान्यता :-**

जिल्हा रस्ता सुरक्षा समितीने सुचविलेल्या कामांना शासनाच्या संबंधित विभागाने प्रचलित नियमानुसार तांत्रिक मान्यता द्यावी. जी कामे विशिष्ट विभागाशी संबंधित नसतील त्याची तांत्रिक मान्यता जिल्हयातील/राज्यातील शासकीय अभियांत्रिकी अथवा शासनाच्या संबंधित संस्थेकडून घ्यावी.

**लेखाशीर्ष :-**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत सन २०२३-२४ पासून राबविण्यात येईल. तथापि, यासाठी जिल्हा निहाय लेखाशीर्ष उपलब्ध करून देण्याची कार्यवाही नियोजन

विभागामार्फत करण्यात येईल. जिल्हा निहाय लेखाशीर्ष उपलब्ध झाल्या नंतरच सदर योजना जिल्हा स्तरावर राबविण्यात येईल.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं-५/का.१४८१, दिनांक १७ फेब्रुवारी,२०२३ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं-१०१/२०२३/व्यय-८, दिनांक २४ फेब्रुवारी,२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३२०१११९५८४३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA
MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2023.03.21 12:37:14 +05'30'

**( राजेंद्र होळकर )**
**सह सचिव, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबइ
४. सर्व मा.मंत्री, मंत्रालय, मुंबई.
५. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८. मा. उपसभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
१०. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
११. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव (गृह) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. प्रधान सचिव (परिवहन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हाधिकारी .
१९. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
२०. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
२१. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई

२२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी कार्यालय, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
२३. वित्त विभाग (सेवा-५), मंत्रालय, मुंबई.
२४. जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व).
२५. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
२६. नियोजन विभाग, कार्या.१४८१, मंत्रालय, मुंबई.
२७. गृह विभाग (बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई.
२८. निवडनस्ती.